नागरी आदिवासी वस्ती सुधारणा योजनेअंतर्गत डहाणू नगरपरिषद, जि. ठाणे या नगरपरिषदेस निधी वितरण करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
आदिवासी विकास विभाग,
**शासन निर्णय क्रमांक : नावयो-२०१०/प्र.क्र. ८८ /का.१२.**
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
**दिनांक : ३० मार्च, २०१०.**

**वाचा:** १) शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र. आवसू-१००६/प्र.क्र.८०/नवि-४, दिनांक ६ फेब्रुवारी, २००७.

२) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र. बीयुडी २००९/प्र.क्र.७/का.७, दिनांक ५ मे, २००९.

३) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र. बीयुडी २००९/प्र.क्र.७/का.६, दिनांक ३० मार्च, २०१०.

**शासन निर्णय** : नागरी आदिवासी वस्ती सुधारणा या योजनेसाठी सन २००९-१० या आर्थिक वर्षासाठी अर्थसंकल्पित केलेल्या निधीपैकी डहाणू नगरपरिषदेसाठी निधी मंजूर करण्याबाबतचा प्रस्ताव नगर विकास विभागाने सादर केला आहे. नागरी आदिवासी वस्ती सुधारणा या योजनेसाठी सन २००९-१० या आर्थिक वर्षासाठी रु.१० कोटी इतका निधी अर्थसंकल्पित केला आहे. डहाणू नगरपरिषदेने सादर केलेल्या कामांच्या अंदाजित किंमतीतून ५ टक्के आकस्मिकता खर्च, २ टक्के कार्यव्ययी आस्थापना व २ टक्के गुणनियंत्रण या बाबी वगळून रु.३२४.४७ लाख (अक्षरी रूपये तीन कोटी चोवीस लाख सत्तेचाळीस हजार फक्त) इतका निधी डहाणू नगरपरिषद, जि. ठाणे यांना सोबतच्या "परिशिष्ट अ" मध्ये नमूद केलेल्या कामांसाठी वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर निधी सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्या अधिनस्त ठेवण्यात आला असून त्यांनी तो तात्काळ संबंधितांना वितरित करावा.

३. सदरचा निधी खर्च करताना उपरोक्त दि.६.२.२००७ च्या शासन निर्णयान्वये निश्चित केलेली मार्गदर्शक तत्वे/कार्यपध्दती विचारात घेण्यात यावी.

४. या बाबीवर होणारा खर्च **"मागणी क्र.टी-५, मुख्य लेखाशिर्ष : २२१७-नगर विकास-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना -८०- सर्वसाधारण-७९६ - जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत- राज्य योजनांतर्गत योजना- (०१) (०२) नागरी आदिवासी वस्ती सुधारणा (२२१७ १२५९) ३१-सहाय्यक अनुदाने" (वेतनेत्तर)** या लेखाशिर्षाखाली सन २००९-१० करीता मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा. तसेच या निधीच्या खर्चाचा मासिक अहवाल आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक व आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना पाठवावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१००३३०१९५२४४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( अ. को. आहिरे )
**कार्यासन अधिकारी**

**प्रति,**

सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
जिल्हाधिकारी, ठाणे.
अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे.
प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, डहाणू, जि.ठाणे.
मुख्याधिकारी, डहाणू नगरपरिषद, डहाणू, जि.ठाणे.
कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण बांधकाम विभाग, ठाणे.
महालेखापाल, लेखापरिक्षा, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे.
वित्त विभाग (व्यय १४/अर्थ-१९), मंत्रालय, मुंबई.
कार्यासन-७, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई.
निवड नस्ती (का.१२)

<u>परिशिष्ट- अ</u>

(शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्रमांक : नावयो-२०१०/प्र.क्र. ८८ /का.१२, दि. ३० मार्च, २०१० चे सहपत्र )

| अ.क्र. | कामाचे नांव | अंदाजित रक्कम (रुपये) |
|---|---|---|
| १ | वॉर्ड क्र. ५ मध्ये फिरदोस अफलातुन यांच्या वाडी जवळ क्रांक्रिट रस्ता करणे. | २४,८४,२७८/- |
| २ | कैनाड रोड ते काठया पाडा कडे जाणारा रस्ता कॉक्रिट करणे. | २४,४४,०६१/- |
| ३ | प्रभाग क्र. १ मध्ये अस्पि मुबारक यांची वाडी ते ईश्वर बाळु दुबळा यांच्या घरापर्यंत क्रांक्रिट रस्ता व सी.डी. वर्क करणे. | ५७,९१,०४०/- |
| ४ | कैनाड रस्त्यावरील काठया पाडा नाका जवळ रस्ता कॉक्रिट करणे. | २४,९६,७१५/- |
| ५ | ब्राम्हणपाडा येथे नारायण कोमच्या घरापासुन ते मुख्य रस्तापर्यंत रस्ता कॉक्रिट करणे. | ४६,८३,७३०/- |
| ६ | सरावली आदिवासी सोसायटी समोर पाईप गटार करणे. | २१,६३,४५६/- |
| ७ | गोंविदा नायक यांच्या घरापासुन ते ईटीग्रेट पाण्याची टाकी पर्यंत कॉक्रिट रस्ता करणे. | ४८,६९,३१०/- |
| ८ | वॉर्ड क्र. ५ मध्ये नवश्या कोती यांच्या शेताजवळ कॉक्रिट रस्ता करणे. | २४,९२,१३४/- |
| ९ | प्रभाग क्र. ५ मध्ये नानु गोविंद धोडी यांचे घर ते रमण मिस्कीटे आदिवासी यांचे घरापर्यंत कॉक्रिट रस्ता करणे. | १५,५०,८३६/- |
| १० | ईटीग्रेट रस्त्यावरील पाण्याची टाकी जवळ रीटेनींग वॉल बांधणे. | ३९,६३,०३९/- |
| ११ | मसोली प्रभुपाडा ते आदिवासी पाडा व घांचीया ते आदिवासी पाडा पर्यंत पाईप गटार करणे. | २७,१८,०००/- |
| | **एकूण** | **३,५६,५६,५९९/-** |
| | **वरील रकमेपैकी ५ टक्के आकस्मिकता, २ टक्के गुणनियंत्रण व २ टक्के कार्यव्ययी आस्थापना या बाबी (एकूण ९ टक्के) वगळून** | **३,२४,४७,५०६/-** |